संजय गांधी निराधार अनुदान योजना समितीच्या
बैठकांमध्ये शिस्तबध्दता व सुसूत्रता आणण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः विसयो २०१५ / प्र.क्र. ९४/विसयो-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार इमारत, मुंबई - ४०० ०३२.
**दिनांक : ४ ऑगस्ट, २०१५**

वाचा--

१) **शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांकः विसयो २००८ प्र.क्र.७८/विसयो-१, दिनांक ३० सप्टेंबर,२००८**
२) **शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांकःविसयो २०१० / प्र.क्र.१७५/विसयो-२,दिनांक २६ ऑक्टोबर,२०१०**
३) **शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांकःविसयो २०११/ प्र.क्र.१२७/विसयो-२,दिनांक ३१ ऑक्टोबर,२०११**
४) **शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांकःसमिती २०१४/ प्र.क्र.१६२/विसयो-२,दिनांक २७ नोव्हेंबर,२०१४**

**प्रस्तावना-**

राज्यामध्ये लाभार्थ्यांनी सादर केलेले अर्ज व निकाली काढलेले अर्ज यासाठी लागणारा कालावधी याचे निरिक्षण केले असता अर्ज मंजूर होण्यास किमान २ महिने ते २ वर्षे इतका कालावधी लागतो असे दिसून आले. याचे प्रमुख कारण लाभार्थ्यांकडून तलाठी किंवा तहसिल कार्यालयामध्ये अर्ज दिल्यानंतर त्याची पोहोच न मिळणे, संजय गांधी निराधार अनुदान योजना समितीच्या बैठका नियमितपणे न घेणे, अर्ज मंजूर झाल्यानंतर बँक खाते क्रमांक देण्यास लागणारा विलंब इ. बाबी आढळून आल्या. या सर्वांमध्ये सुसूत्रता आणण्याकरता शासनामार्फत खालील प्रमाणे सविस्तर सूचना देण्यात येत आहेत .

**परिपत्रक** :--

संजय गांधी निराधार अनुदान योजना समितीच्या बैठका खालील दिनांकांना यापुढे आयोजित करण्यात याव्यात--

| अ.क्र. | दिनांक | हा दिनांक निवडण्याचा हेतू |
|---|---|---|
| १ | ३ जानेवारी | क्रांतिज्योती सावित्रीबाई फुले जयंती |
| २ | १० मार्च | क्रांतिज्योती सावित्रीबाई फुले पुण्यतिथी |
| ३ | ११ एप्रिल ते १४ एप्रिल | महात्मा ज्योतीबा फुले जयंती / डॉ. बाबासाहेब आंबेडकर जयंती |
| ४ | २७ मे | माता रमाबाई आंबेडकर यांची पुण्यतिथी |
| ५ | २६ जून | राजर्षी छत्रपती शाहू महाराजांचा जन्मदिवस |
| ६ | १५ ऑगस्ट | स्वातंत्र्य दिन |
| ७ | २ ऑक्टोबर | महात्मा गांधी जयंती |
| ८ | ६ डिसेंबर | डॉ. बाबासाहेब आंबेडकर महापरिनिर्वाण दिन |

( समितीची बैठक आयोजित करण्यास शासकीय रजा व अन्य काही बाबी उदभवू शकतात. म्हणून या दिनांकांना बैठक आयोजित करण्यात आली नाही तर त्याच्या ३ दिवस अगोदर किंवा ३ दिवस नंतर अशात-हेने बैठक आयोजित करण्यात यावी. )

(१) संजय गांधी निराधार अनुदान योजना समिती गठीत झाली असेल तर अशी बैठक घेण्यास काहीही अडचण येणार नाही. मात्र समिती गठीत झाली नसेल तर संबंधित तहसिलदार बैठक घेतील. याशिवाय या तारखे दरम्यान संजय गांधी समितीच्या अध्यक्षांनी बैठकीस उपस्थित रहाण्यास असमर्थता दर्शविल्यास तहसिलदार यांच्या अध्यक्षतेखाली बैठक घेण्यात यावी. मात्र कोणत्याही परिस्थितीत बाब क्रमांक १ मधील तारखांच्या दरम्यान बैठक आयोजित करण्यात यावी. अशी बैठक आयोजित न झाल्यास त्याची जबाबदारी तहसिलदार यांची असेल.

(२) या समितीच्या कामकाजात अधिक पारदर्शकता यावी म्हणून अशा बैठकांचे व्हीडीओ शुटींग करण्यात यावे. याकरीता कार्यालयीन खर्चातून २० हजार रुपयापर्यन्त छोटा हॅण्डकॅम्प कॅमेरा व संजय गांधी योजना तहसिलदार कार्यालयाने विकत घ्यावा व यासोबत अंदाजे एक हजार रुपयाचे कॅमेरा स्टॅंड विकत घ्यावे. १६ जीबीच्या मेमरीमध्ये अंदाजे ७ तासाची व्हीडीओ शुटींग होऊ शकते. एका सभेच्या कामकाजाची वेळ कमीत कमी १ तास ते ५ तास असू शकते. पूर्ण कार्यक्रमाचे शुटींग झाल्यानंतर ही मेमरी लॅपटॉपमध्ये किंवा डेस्कटॉपवर ही व्हीडीओ क्लीप ट्रान्सफर करता येते व फॉरमेट केलेली मेमरी पुन्हा उपयोगासाठी आणता येते. यामुळे प्रत्यक्ष सभेत कामकाज कसे झाले, चर्चेत कोणते मुद्दे होते हे वरिष्ठ कार्यालयांना अभ्यासिता येते.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८०४१७३६०३७८२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Uke Ujjwal

Digitally signed by Uke Ujjwal
DN: c=IN, o=ALL INDIA SERVICE, ou=IAS, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Uke Ujjwal
Date: 2015.08.04 17:38:55 +05'30'

( उज्ज्वल उके )
**प्रधान सचिव**

**प्रत,**

१) मा.राज्यपालांचे सचिव,

२) मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य,

३) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,

४) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,

५) सर्व जिल्हयांचे पालकमंत्री,

६) सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

७) सर्व जिल्हापरिषदांचे अध्यक्ष,

८) महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा)१/२, महाराष्ट्र राज्य मुंबई/नागपूर

९) सचिव, ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार, कृषि भवन, नवी दिल्ली,

१०) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग,

११) प्रधान सचिव, वित्त विभाग,

१२) प्रधान सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,

१३) सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग,

१४) सचिव, महिला व बालविकास विभाग,

१५) सचिव, नगर विकास विभाग,

१६) सचिव,भारतीय आयुर्विमा महामंडळ, योगक्षेम इमारत, मुंबई

१७) विभागीय विमा अधिकारी ठाणे/पुणे/सातारा/अमरावती/औरंगाबाद/नाशिक/नागपूर,

१८) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,

१९) संचालक,नागरी प्रशासन, नवीन प्रशासकीय इमारत,मुंबई,

२०) वित्त विभाग (व्यय-१४/कोषा-४),

२१) सर्व मंत्रालयीन विभाग,

२२) सर्व विभागीय आयुक्त (महसूल),

२३) सर्व महापालिका आयुक्त,

२४) सर्व जिल्हाधिकारी

२५) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद (सर्व),

२६) संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे,

२७) संचालक, शालेय शिक्षण संचालनालय, पुणे,

२८) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,

२९) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,

३०) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई,

३१) विभागीय समाजकल्याण अधिकारी (मुंबई/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपूर),

३२) सर्व विमा अधिकारी (महाराष्ट्रातील)

३३) सर्व उप विभागीय उप जिल्हाधिकारी (प्रांत अधिकारी)सर्व तहसिलदार/सर्व नायब

३४) तहसिलदार (संगायो),

३५) सर्व कोषागार अधिकारी/ सर्व उपकोषागार अधिकारी

३६) सर्व नगरपालिकांचे मुख्याधिकारी,

३७) सर्व सामाजिक कार्यकर्ते (महिला व बालविकास विभाग),

३८) सर्व पंचायत समित्यांचे गट विकास अधिकारी,

३९) सर्व ग्रामपंचायती/सर्व सरपंच/सर्व पोलीस पाटील/सर्व तलाठी/सर्व ग्रामसेवक

४०) सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव/कार्यासन अधिकारी, सा.न्या.व वि.स.विभाग,मंत्रालय,मुंबई

४१) संचालक,शालेय शिक्षण, पुणे

४२) सर्व उपसंचालक, शालेय शिक्षण

४३) सर्व तहसिलदार, संजय गांधी योजना कार्यालय

४४) निवडनस्ती